भगवती रुग्णालय, बोरीवली येथील शवविच्छेदन केंद्र सुरु करण्यासाठी नविन पदे निर्माण करुन ती विहित पध्दतीने भरण्यास मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक:सीआरए-०११८/३४४३/(४७)/पोल-४,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक :22 मार्च, २००१.

वाचा :- १) गृह विभाग, शासन अध्यादेश दिनांक २७.७.१९९९.
२) शासम निर्णय क्रमांक:सीआरए-०११८/३४१४/(४७)/पोल-४, दि.९.७.९९.
३) पोलीस शल्यचिकित्सक,मुंबई यांचे पत्र क्र.पोशचि/भगवती/६४७/२०००,दि.२२.११.२०००.
४) पोलीस शल्यचिकित्सक,मुंबई यांचे पत्र क्र.जेजेशविके/भगवती/११८/२००१,दि.१.३.२००१.

शासन निर्णय :- बृहन्मुंबईमध्ये कार्यरत असलेला कॉरोनर ॲक्ट १८७१, हा उपरोक्त अ.क्र.१ मध्ये नमूद अध्यादेशान्वये रद्द करण्यात आलेला असून त्याऐवजी बृहन्मुंबईमध्ये फौजदारी प्रक्रिया संहिता १९७३ च्या कलम १७४/१७६ नुसार कार्यवाही अंमलात आली आहे. तसेच उपरोक्त अ.क्र.२ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये बृहन्मुंबईमध्ये १४ ठिकाणी शवविच्छेदन केंद्रे सुरु करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. सध्या बृहन्मुंबईमध्ये कार्यरत असलेली शवविच्छेदन केंद्रे व नव्याने सुरु करावयाची शवविच्छेदन केंद्रे यांचे विवरण खालील प्रमाणे आहे.

| सध्या अस्तित्वात असलेली शवविच्छेदन केंद्रे | नव्याने सुरु करावयाची शवविच्छेदन केंद्रे |
|---|---|
| १) जे.जे. रुग्णालय, भायखळा मुंबई. | १) कामा ॲण्ड आल्बेस रुग्णालय,मुंबई. |
| २) राजावाडी रुग्णालय, घाटकोपर,मुंबई. | २) भगवती रुग्णालय, बोरिवली, मुंबई. |
| ३) कुपर रुग्णालय, जुहू, मुंबई. | ३) सिध्दार्थ रुग्णालय, गोरेगांव, मुंबई. |
| ४) सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई. | ४) शताब्दी रुग्णालय, कांदिवली, मुंबई. |
| ५) गोकूळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई. | ५) म.फुले रुग्णालय,कन्नमवारनगर,विक्रोळी |
| ६) के.ई.एम. रुग्णालय, परळ, मुंबई | ६) शताब्दी रुग्णालय, गोवंडी, (चेंबूर) |
| ७) लोकमान्य टिळक रुग्णालय, सायन,मुंबई | |
| ८) टि.एन.नायर रुग्णालय, मुंबई सेंट्रल. | |

२. उपरोक्त नविन शवविच्छेदन केंद्रापैकी भगवती रुग्णालय, बोरीवली येथील शवविच्छेदन केंद्र सुरु करण्यासाठी आवश्यक त्या मूलभूत सोयी सुविधा उपलब्ध झालेल्या असल्याने खालील नमूद २१ नविन पदे निर्माण करण्यास व ती विहित पध्दतीने भरण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर २१ नविन पदे विहित पध्दतीने भरण्याबाबतची कार्यवाही पोलीस शल्यचिकित्सक, शवविच्छेदन केंद्र, नागपाडा, मुंबई यांनी

तातडीने करावी.

| अ.क्र. | पदाचे नांव | पदांची संख्या | वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ | ४ | ८०००-२७५-१३५०० |
| २ | लघुटंकलेखक, वर्ग-३ | १ | ४०००-१००-६००० |
| ३ | कनिष्ठ लिपिक, वर्ग-३ | १ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ४ | शवविच्छेदन सेवक, वर्ग-४ | ४ | २५५०-५५-२६६०-६०-३२००<br>(विशेष वेतन रु.१००/-) |
| ५ | चतुर्थश्रेणी कर्मचारी, वर्ग-४ | १ | २५५०-५५-२६६०-६०-३२०० |
| ६ | ए.सी.प्लँट ऑपरेटर, वर्ग-३ | ३ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ७ | शवगृह सहायक, वर्ग-४ | ३ | २७५०-७०-३८००-७५-४४००<br>(विशेष वेतन रु.१००/-) |
| ८ | शवगृह सेवक, वर्ग-४ | ४ | २५५०-५५-२६६०-६०-३२००<br>(विशेष वेतन रु.१००/-) |
| | एकूण :- | २१ | |

३. उपरोक्त नमूद २१ नविन पदांसाठी वेतन व भत्त्यासाठी येणाऱ्या सुमारे रु.१७,३४,२५२/- इतक्या आवर्ती खर्चासही शासन मान्यता देत आहे. सदरहू २१ नविन पदांसाठी वेतन व भत्त्यापोटी येणारा वार्षिक आवर्ती खर्च प्रथम बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून भागविण्यात यावा. तद्नंतर सदर खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून प्रत्येक आर्थिक वर्षाच्या शेवटी बृहन्मुंबई महानगर पालिकेला करण्यात येईल. उपरोक्त निर्माण करण्यात आलेल्या २१ पदांवर तांत्रिक नियंत्रण पोलीस शल्यचिकित्सक, मुंबई यांचे राहिल.

४. उपरोक्त २१ नविन पदांसाठी येणारा वार्षिक आवर्ती खर्च गृह विभाग मागणी क्र.बी-६, लेखाशीर्ष "२०५५-पोलीस, १०८ राज्य मुख्यालय पोलीस, १०८ (सहा) बृहन्मुंबईतील शवविच्छेदन केंद्र, (०१) वेतन, (२०५५०३११)" खाली खर्ची टाकून तो प्रतिवर्षीच्या मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर-१६२०/२०००/व्यय-७, दि.३.११.२००० व क्र.५३०/२०००/अर्थ.१९, दि.१५.१२.२००० ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

रा.बा.घाडगे
२२/३/२००१

( रा. बा. घाडगे )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, बृहन्मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

जिल्हाधिकारी, मुंबई (शहर).
जिल्हाधिकारी, मुंबई (उपनगर जिल्हा).
संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस शल्य चिकित्सक, नागपाडा, मुंबई.
अधिष्ठाता, जे.जे. रुग्णालय, भायखळा मुंबई.
अधिक्षक, राजावाडी रुग्णालय, घाटकोपर, मुंबई.
अधिक्षक, कुपर रुग्णालय, जुहू , मुंबई.
अधिक्षक, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई.
अधिक्षक, गोकूळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई.
अधिक्षक, के.ई.एम. रुग्णालय, परळ, मुंबई.
अधिक्षक, लोकमान्य टिळक रुग्णालय, सायन, मुंबई
अधिक्षक, टि.एन.नायर रुग्णालय, मुंबई सेंट्रल, मुंबई.
वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
अधिक्षक, भगवती रुग्णालय, बोरिवली, मुंबई.
कार्यासन (बीयुडी-१/ पोल-७/ वि.शा.२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (पोल-४).